आजच्या महाराष्ट्रांतील

परमार्थवादी तत्त्वज्ञानी

गुरुवर्य प्रा. रा. द. रानडे

यांना

ह्या संग्रह नम्रपणानें

अर्पिला आहे.

य. द. भावे

# नि वे द न

'आर्द्रा' नंतर इतक्या थोड्या अवधीत 'हळवें भिंग' रसिकांच्या पुढें ठेवतांना मला आनंद वाटणे साहजिकच आहे. हा काव्यसंग्रह प्रकाशित करण्याचें सर्वच श्रेय मधुकर प्रिंटिंग प्रेसच्या पै पितापुत्रांचे. अत्यंत आपुलकीने त्यांनीं सर्व जबाबदारी पार पाडली. त्यांचे आभार संपूर्णतया यथार्थतेनें मानणें माझ्या आवाक्याबाहेरचे आहे.

'हळवें भिंग' या नांवाविषयीं. 'हळवें' हा शब्द Sensative या शब्दाचा पर्याय म्हणून वापरला आहे. कॅमेऱ्यातील 'नेगेटिव्ह' सुद्धां टिपणें (Impressions) घेते; पण ती यांत्रिकतेच्या नेणीवेंत. ही कांच मात्र जाणीवेच्या आणि जागून उठलेल्या नेणीवेच्या परिणामदर्शकाची अनुभूति टिपून घेते.

या संग्रहांतील बऱ्याच कविता **सत्यकथा, साहित्य, अभिरुचि, सुषमा, नवभारत** इत्यादि प्रमुख मराठी मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. जवळ जवळ निम्या सत्यकथेंतून प्रकाशित झाल्या.

नवकवितेसंबंधीच्या माझ्या कल्पना मी प्रस्तावनेंत मांडलेल्या आहेतच. त्यासंबंधी येथे निराळें लिहिण्याचें कारण नाहीं.

माझ्या कवितांचे मूल्यमापन टीकाकार करतीलच. माझ्या अनुभवास जें जें आलें तें तें लिहिलें. कांहीं मुक्तछंदात, कांहीं पादाकुलकांत तर कांहीं शुद्ध गद्यांत. कवितेचे व्यवच्छेदक लक्षण वृत्त किंवा गेयता नसून ' अंतर्संगीत ' हें होय हा माझा विश्वास.

माझ्या कविताशैलीवर अनेकांचा परिणाम झाला आहे. पण मुख्यत्त्वेंकरून अत्याधुनिक आंग्लकवींचा. त्या सर्वांच्या ऋणाचा उल्लेख कृतज्ञतापूर्वक करीत आहे.

— य. द. भावे

१–३–१९५१
३२८, ठळकवाडी,
बेळगांव.



# नवकवितेसंबंधीं

— १ —

जुनी कविता आणि नवकविता यांमधला फरक नुसता कालनिदर्शक नाहीं. तो वैशिष्ट्यनिदर्शक आहे. कारण १९५० सालांतहि असे कांहीं कवी आहेत की, जे अजूनहि जूनें सूर आळवीत आहेत. नवकवितेचें वैशिष्ट्य केवळ वृत्त-वैचित्र्यांत, मुक्तछंदाच्या उपयोगांत, किंवा वृत्तांच्याविरुद्ध पुकारलेल्या बंडखोरींतहि नाहीं. कारण मुक्तछंदांतच काय, पण शुद्ध गद्यांतहि लिहिलेलीं काव्यें पारंपरिकतेनें भरलेलीं आढळ-तील. नवकवितेचें वैशिष्ट्य कांहीं एका तऱ्हेच्या शब्दप्रयोगांतहि नाहीं, किंवा यान्त्रिकयुगाच्या प्रतिमांच्या सढळ आणि सवंग वापरांतहि नाहीं. कारण अशा शब्दांचा आणि प्रतिमांचा वापर, 'गुलाबी गाल, पोवळ्याचे ओठ, हरिणाचे डोळे, वगैरे शब्दसमुच्चयाच्या उपयोगाइतकाच सोपा आहे. हें सर्व वरवरचें, पोशाखी आहे. 'नवकविता' आणि 'जुनी कविता' यांमधला फरक बाह्याचा नाहीं. तो आंतरिक आहे. तो वैचा-रिक क्रांतीचा निदर्शक आहे. तो वेगळेपणा, 'नवकवि' आणि जुने कवी यांची तत्त्वज्ञानाची बैठकच निरनिराळी अस-ल्यानें निर्माण झाला आहे.

— २ —

अंतिम वास्तवाचें ( Reality ) स्वरूप समजून घेणें आणि त्या अनुभूतीची यथार्थ अभिव्यक्ति करणे हे कलेचे वा काव्याचें कार्य नवकवि आणि जुने कवि या दोघानाहि सारखेच अभिप्रेत असतें. पण जुन्या कवीच्या वास्तवाबद्दलच्या कल्पना संकुचित नसल्या तरी अपुऱ्या असतात. इतकेंच नव्हे तर अंतिम वास्तवाचें रूप समजून घेतांना तो आपल्या कविव्यक्तिमत्त्वाचा ( Poetic Personality ) अर्धामुर्धा भागच उपयोगांत आणतो. त्यामुळें दुहेरी तऱ्हेनें त्यानें घेतलेला वास्तवाचा मागोवा हा अपूर्ण असतो त्या मानानें नवकवीचा मागोवा हा पूर्ण असतो. कारण त्याच्या वास्तवाबद्दलच्या कल्पना गतिमान् ( Dynamic ), क्रांतिकारक, पुरोगामी आणि शास्त्रीय असतात. वास्तवाचे रूप समजून घेतांना आणि त्यामुळें आलेल्या अनुभूतीची अभिव्यक्ति करताना तो आपली कवि-अस्मिता किंवा आपलें ' कवि-व्यक्तिमत्त्व ' पूर्णतया उपयोगात आणीत असतो. हे कसे घडतें याचा आता विचार करावयाचा.

— ३ —

केवळ कल्पनारम्यत्ववादी कवी ( Romantic ) म्हणजे जुने कवी असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. वस्तुनिष्ठतावादी ( Realists ) जुने असतात इतकेंच नव्हे तर पलायनवादी ( Escapists ) आणि अधोगामी ( Decadents ) हेहि जुने असूं शकतात. हा फक्त

जातिभेदाचा फरक, पण धर्माचा नव्हे. या सर्वांचा धर्म एकच.

वस्तुनिष्ठतावादी कवींच्या वास्तवाच्या कल्पना जडवादी किंवा उपयुक्ततावादी तत्त्वज्ञानावर आधारलेल्या असतात. स्पर्शेंद्रियवादी ह्यूम, गणितांतील यंत्रवादी न्यूटन आणि उपयुक्ततावादी लॉक यांच्या विचारसरणींतून वस्तुनिष्ठवाद्यांना स्फूर्ति मिळाली. 'वास्तव' म्हणजे स्पर्शेंद्रियांना किंवा तत्सम शास्त्रीय उपकरणांना जे कांही गोचर असेल तेवढेच अशी कल्पना रूढ झाली. वास्तव समजून घेण्यासाठी मानवाने **बुद्धीचाच** उपयोग करावा असं तत्त्वज्ञांनी सांगितले त्याप्रमाणे कला आणि वाङ्मयांत कलावंतांनी बुद्धीच्या हत्याराचा उपयोग करण्यास सुरवात केली पोपसारखे कवी आपल्या नाकाच्या शेंड्याखालचेच वास्तव वर्णन करण्यात गुंगून गेले. इतकेच नव्हे तर भावना आणि कल्पना या आयुधांचा वापर करणारे टिंगलीचा विषय बनले.बुद्धीचा उदो उदो झाला मानवी मनात बुद्धीप्रमाणेंच इतरहि कांहीं असतें ही गोष्ट ते विसरले. त्यामुळें त्यांचें वास्तवाचें शोधन अपुरं झालें; आणि भावनांना दाबून टाकण्याच्या प्रयत्नांत, दबलेल्या भावनांनीं इतका कांहीं सूड घेतला कीं, या बुद्धिवादी युगातच भावनातिरेकानें किंवा भावनाविवशतेनें ओथंबलेले ( Sentimental ) वाङ्मय जन्माला आले.

याउलट लौकरच बंडखोरी सुरू झाली. मानवी डोळ्यांना स्पर्शेंद्रियांना किंवा तत्सम शास्त्रीय उपकरणांना दिसणाऱ्या

विश्वापलीकडेहि विश्व आहे; केवळ बुद्धीला गम्य तेवढेंच आणि तेंच 'वास्तवाचें विश्व' हें चूक आहे, किंबहुना तें वास्तव नव्हेंच, ही गोष्ट कान्टपासूनच्या तत्त्वज्ञान्यांनी आणि रोमॅन्टिक कवींनीं सांगितली. सहजप्रवृत्ति, प्रेरणा, श्रद्धा आणि मुख्यतः कल्पना याच्याद्वाराच वास्तव वा सत्य समजतें असें त्यांनीं वजाविलें. कल्पनाशक्तीला इतकें महत्त्व आलें कीं हॅझलिटनें काव्याची व्याख्या "कल्पना आणि भावना यांची भाषा," अशी केली तर शेली कवीनें 'कल्पनेची भाषा' अशी केली. हीं सर्व कल्पनावादी मंडळी बुद्धिवाद्यांच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन उभीं राहिलीं. पण या मंडळींनीं वास्तवरूप आकलनार्थ केवळ कल्पनाशक्तीचाच उपयोग केल्यानें त्यांचेंहि शोधन अपुरें होतें.

त्यानंतर पुनः एकदां लंबक ( Pendulum ) उपयुक्ततावादाकडे झुकला. दार्विनच्या मीमांसेनें, रसायनशास्त्र पदार्थविज्ञानशास्त्र, आणि अर्थशास्त्र यांतील विचारप्रणालीमुळे वास्तवाची कल्पना उपयुक्ततावादाशीं निगडित झाली. ईश्वर वगैरे कांहीं गुप्तशक्ति विश्वाच्या मागें आहे ही कल्पना कचऱ्याच्या टोपलींत गेली. त्याचे परिणाम वाङमयात निरनिराळे घडले. कांहीं मंडळी ही जिकीर आतां झेंपत नाहीं असें म्हणत कलेच्या हस्तीदंती मिनारात, पऱ्याच्या विश्वांत, इंद्रमहालांत जाऊन दडलीं. समाजापासून दूर पळालीं. कांहीं ही विचारप्रणाली गिळून बसलीं आणि जुन्या कल्पनाची त्यांना अडगळ वाटूं लागली. त्यांनीं त्या त्यागिल्या किंवा नवकल्पनांशी

कांहीं लटपट करून भोंगळपणानें त्यांचा सांधा जुळवून दिला. कांहीं मंडळींची अगदीं घाबरगुंडी उडाली आणि तीं "देवबाप्पा बुडला आतां जीवन कसें रेटायचें ?" असें उसासे टाकूं लागलीं. कांहीं म्हणूं लागलीं कीं, 'जें कर्मीं येईल तें तें अविचल चित्तीं भोगावें.' या वास्तवाच्या बाबतींत लोकांच्या मनाचा इतका गोंधळ उडून गेला कीं ज्याला त्याला आपली श्रद्धा ही केव्हांतरी डळमळणार अशी सदाची भीति वाटू लागली या सर्व मंडळींचा दृष्टिकोण आपआपल्या तऱ्हेनें अपुरा होता; आणि दुसऱ्या एका अर्थानें तर अगदींच अपुरा होता. कारण रोमँन्टिक काय, रिॲलिस्ट्स काय, किंवा पलायन-वादी, अर्धेमुर्धे इकडे तिकडे लुडबुडणारे काय, ते सर्व वास्तव समजण्यासाठीं मानवी मनाचा एक भागच, भागांतला भागच उपयोगांत आणीत होते; आणि तो भाग म्हणजे मुख्यतः जागृत मन हाच होता.

— ४ —

साधारणपणे १९ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं सर्व शास्त्रांतून कांहीं क्रांति घडूं लागली होती. पदार्थ--विज्ञानांतील पंडितांनीं कांहीं नवें सांगावयास सुरवात केली. "पदार्थ ( Matter ) हा वीजकणांचा ( Elections ) बनला आहे आणि या वीजकणांच्या चलनांत जरी एक प्रकारचें सातत्य आढळलें तरी तें सातत्य केवळ मायामय आहे." रसायन-शास्त्रज्ञांनीं आणि जीवशास्त्रज्ञांनीं विनाजिवाचें वस्तुजात

(Inorganic matter) सजीव वस्तुजात(organic) कसें बनलें हें आम्हाला गूढ आहे असें मोकळेपणानें सांगितलें. त्यामुळे बाह्यसृष्टि ही वास्तवाच्या यथार्थ स्वरूपाची निदर्शक नव्हे ही गोष्ट उघड झाली मानसशास्त्राचें संशोधन तर नव्या नव्या भानगडी उजेडांत आणूं लागलें. त्यानें मुळीं मानवी मनाबद्दलच्या कल्पनाच बदलल्या. मन हें एक नव्हे तर मनें अनेक आहेत; निदान मनात अनेक कप्पे आहेत मनांतील एका भागाचेंच--जागृत मनाचें--कार्य आपल्याला ज्ञात असतें. याशिवाय मनाचा आणखीही एक भाग आहे. तो म्हणजे सुप्त वा अर्धसुप्त मन. हा भागहि ज्ञाताविश्वाचें आकलन करीत असतो. त्या अथांगतेंत जागृत मनाला समजलेल्या बाह्यसृष्टीचें कांही निराळेंच रूप बनलेलें असतें. तेथें काय काय सांचतें कोणास ठाऊक ? त्याच रूपहि न्यारेंच. हे असें वारंवार घडतें, नेहमीच घडतें, हा अनुभव मानसशास्त्रज्ञांना आणि मनो विश्लेषणी पडीताना येऊं लागला. त्यावरून नुसत्या जागृत मनानें आकलन केलेलें वास्तवाचें रूप पूर्ण नाहीं हे उघड झालें. त्यामुळें सुप्त, व अर्धसुप्त मनाला अत्यंत महत्व प्राप्त होऊन युंग आणि फ्राईड यांचें शिष्यत्व पत्करणारे कलेंत आणि काव्यात उत्पन्न झाले. ते म्हणूं लागलें, कीं सत्य वा वास्तव हे बाह्यसृष्टीपलीकडचें, जागृतमनान घेतलेल्या ठशांच्या पलीकडचें आहे. तेव्हां वास्तवाचे रूप समजण्यासाठीं ज्ञाताचा वा जागृत मनाचा उपयोग नाहीं. तर यासाठीं अर्धसुप्त वा सुप्त मनाची, अज्ञात वा अव्यक्त मनाचीच मदत घ्यावयाची. त्यांनीं त्याप्रमाणें यत्न केला. त्यांत थोड्या कांहींजणांना

" थोडेसें काहीं " दिसलें पण बहुतेक सर्वजण अज्ञाताच्या वा अव्यक्ताच्या चिखलांत इतके खोल रुतून बसले, कीं त्यांची मनोवृत्ति पूर्णतया विकृत बनली. कोणच्याहि गोष्टीचा अतिरेक सूड घेतो तो असा. या अंतर्मनवाद्यांचेंहि शोधन अपुरें होतें. कारण त्यांनीं जागृत मनाला अडगळीच्या खोलींत टाकून दिलें होतें.

— ५ —

नवकवीचें कार्य, वर निदर्शिलेल्या सर्व कलावंतांहून किंवा कवींच्याहून जास्त अवघड आणि निराळें असतें. प्लेटोपासून आजतागायत, तत्त्वज्ञांनीं, शास्त्रज्ञांनीं, मानसशास्त्रज्ञांनीं आणि मनोविश्लेषणी पंडितांनीं वास्तवासंबंधीं जें जें काय सांगितलें आहे त्याचा तो यथार्ततेनें विचार करतो. त्याचप्रमाणें पौर्वात्य तत्त्वज्ञानानें काढलेलीं प्रमेयेंहि तो मनन करतो; आणि वास्तवाच्या कल्पनेचा एक प्रकारचा मेळ बसवितो. वास्तवाचें स्वरूप समजावून घेण्यासाठीं तो जागृत मनाइतकाच सुप्त वा अर्धसुप्त मनाचा उपयोग करून घेतो. पदार्थविज्ञानांत '**पॅरलेलोग्राम ऑफ फोर्सेस**' म्हणून एक प्रकरण आहे. त्यावरून प्रेरणांचा परिणामदर्शक ( रिझल्टंट ऑफ फोर्सिस ) कसा काढावयाचा हें समजतें. नवकवीला असाच प्रेरणाचा परिणामदर्शक काढावयाचा असतो. जागृत मनानें म्हणजे जागृत मनांतील कल्पना, बुद्धि, भावना इत्यादिकांची मदत घेऊन वास्तवाचें रूप टिपून घेतांना आलेला अनुभव, आणि अर्धसुप्त वा सुप्त मनाला जागें करून आलेला

अव्यक्ताचा अनुभव यांचा ताळमेळ साधण्यासाठी तो मनःपूर्वक यत्न करतो. या दोन प्रेरणांचा तो परिणामदर्शक काढतो. हा आलेला परिणामदर्शक हें वास्तवाचें जास्तींत जास्त यथातथ्य स्वरूप असते. ही जी अनुभूती त्याला येतें तिची तो यथार्थतेने अभिव्यक्ति करीत असतो. या कार्यासाठीं भावना, कल्पना, बुद्धि वा पृथःकरणाची शक्ती, अंतःप्रेरणा ( Intution ) आणि संयोजना करण्याची शक्ति ( Synthesis ) एकसमयावच्छेदेंकरून तो कार्यप्रवण करतो. जागृत मन आणि अर्धसुप्त वा सुप्तमन याच्या अनुभवाचा मेळ काढून आलेल्या अनुभूतीचा तो आविष्कार किंवा अभिव्यक्ति करीत असतो. त्यासाठीं मानवी अस्मितेच्या वा व्यक्तिमत्त्वाच्या सर्वच्या सर्व पैलूंचा तो वापर करीत असल्यानें त्याचें संपूर्ण कविव्यक्तिमत्व या कामीं लागलेलें असतें. पूर्वीचे कवि, जुने कवि आपल्या मनाचा म्हणजे पर्यायानें कविव्यक्तिमत्वाचा एकादाच भाग कार्यप्रवण करीत असत. त्यामुळें त्यांनीं वास्तवाचा घेतलेला मागोवा अपूर्ण होता. नवकवि हा, ह्या बाबतीत ( म्हणून सर्व बाबतीतच ) जुन्या कवींच्यापेक्षां या अर्थानें पुरोगामी असतो.

— ६ —

संपूर्ण कविव्यक्तिमत्त्वाचा उपयोग करून वास्तवाचें संशोधन करून आलेली अनुभूती यथार्थ अभिव्यक्त करावयाची हेंच नवकवीचें कार्य. हे कार्य करण्यासाठीं मनाची शक्ती वाढली पाहिजे हें उघड आहे. तेव्हां ही जबाबदारी नवकवीवर

साहाजिकच आहे. मनाची शक्ती सहजप्रवृत्तींना ( Instincts ) योग्य तऱ्हेनें शिक्षण देऊन, त्यांच्यावर अनैसर्गिक दडपण न आणतां, त्यांच्या अविष्काराला योग्य वाट देऊन त्या शुद्ध करीत करीतच त्यांचें उदात्तीकरण ( Sublimation ) करण्यानें वाढते. अनैसर्गिक दडपणानें त्या विकृत बनतात; इतक्या कीं शरीरांतलें गुप्त दुखणें, जसें गळवें, खरूज किंवा इतर कांहीं त्वचारोगाच्याद्वारां फुटतें, तसेंच या बाबतीत घडतें. कोणाच्या मनाच्या गांठीं आंतल्या आंत चिघळूं लागतात आणि मग त्यांना निरनिराळे गंड होतात, त्याचप्रमाणें या बाबतींतली स्वैरताहि मारक ठरते. त्यामुळें अनैसर्गिक प्रदर्शन व्यथेचा गंड जडतो. त्यांतून त्या गंडाचा बाजार मांडावासा वाटूं लागतो. नवकवि या बाबतींत जागरूक असतो. नाहींतर आपली अभिव्यक्ति ही अधोगामी ( Decadent ) स्वरूपाची होईल; ( Neurotic ) किंवा अनैसर्गिकतेनें बरबटलेली असेल हें त्यास पक्कें ठाऊक असतें. नवकविता ही अधोगामी नाहीं. तिचें आणि अधोगामित्वाचें कट्टें वैर आहे. ती पुरोगामी आहे.

— ७ —

वर वर्णिल्याप्रमाणें पूर्ण वाढलेलें मन वास्तवशोधनाच्या कामीं संपूर्णतया नवकवि लावीत असतो. जागृत आणि अर्धसुप्त मनाच्या अनुभवांच्या अनुभूतीचा अविष्कार करतांना त्याला साहाजिकच प्रतिमा आणि प्रतीकें यांचा उपयोग करावा लागतो. कारण त्याचा जागृताबरोबर अर्धसुप्ताशी संबंध

आस्थानें; त्याला प्रतिमा प्रतीकावाचून गत्यंतरच नसतें. कल्पनेचा थोडासा गणिती उपयोग करून तो हीं प्रतीकें किंवा प्रतिमा करीत असतो. प्रतीकें आणि प्रतिमा सहज प्रवृत्तींच्या संस्कारांच्या आणि शिक्षणाच्या विश्वांतून उस्फूर्त होऊन येतात. त्या प्रतिमा किंवा प्रतीकें एकामागून एक अशीं येऊन सजीवतेच्या कार्यप्रवणतेंत मिसळून जातात. या प्रतिमा-प्रतीकां-द्वारांच, कवीनें अभिव्यक्त केलेली अनुभूती वाचक उमगूं शकेल आणि त्याला तिचा बोध होईल. काव्याचें विश्वच मुळीं अशरीरी; आणि येथें तर जाग्या मनाच्या अनुभवाचा आणि जाग्या झालेल्या सुप्त वा अर्धसुप्तमनाच्या अनुभवाचा प्रेरणा-निदर्शक काढावयाचा. हें कार्य आंतरविश्वाचें. तेव्हा प्रतिमा या प्रतीकें, किंवा प्रतीकरूप बनलेल्या प्रतिमा हा नवकवितेचा सजीवतेनें निगडित झालेला भाग असतो. येथें प्रतिमांची जुळणी दूरान्वयानें झालेली नसते. अनुभूतीशी त्या अगदीं जिवंतपणानें एकसंधी बनल्या असल्यानें त्या अभिव्यक्तीचा सजीव भाग बनूनच बाहेर येतात.

हीं प्रतीकें किंवा प्रतिमा, किंवा प्रतीकरूप बनलेल्या प्रतिमा यांचें स्वरूप एका विशिष्ट तऱ्हेचेंच असावें असें म्हणणें सयुक्तिक नाहीं. मनाची घडण निरनिराळ्या संस्कारांच्या रासायनिक प्रक्रियेनें होते. नवकवीनें नेहमींच यंत्रयुगाशीं निगडित असलेल्या आजच्या जीवनाचा भाग बनलेल्या यंत्राच्या किंवा तद्विषयक प्रतिमांचा वापर करावा असें म्हणणें एकांगी होईल. आजच्या कवीचे विशेषतः मराठी कवीचें मन

तर फारच भानगडीचें. त्याच्या मनावर पौर्वात्य आणि पाश्चि-मात्य संस्काराच्या विचित्र मिश्रणाचा परिणाम झालेला असतो. शिवाय दर घटकेला आवर्तीभोवतीं घडणाऱ्या गोष्टींचाहि त्याच्या मनावर परिणाम होत असतो. तेव्हां त्याला आलेल्या 'अनुभूतीला' अभिव्यक्त करतांना त्यानें आजच्या जीवनाशीं निगडित झालेल्या यंत्रादिविषयक प्रतिमांचा उपयोग करणें जितकें योग्य, तितकेंच पौर्वात्य संस्कृतीचा एक महत्वाचा भाग भागवत, महाभारत. रामायणादि महाकाव्यें, पुराणें पोथ्या यांतील कथांचा, प्रसंगांचा, व्यक्तींचा, पात्रांचा प्रतीकरूप वापर करणें नैसर्गिक. प्रतीकरूपी प्रतिमा जुन्या असल्या तरी त्यांच्या वापरांतून जर नवा अर्थ बाहेर पडत असेल तर त्यांचाहि उपयोग नवकवीला अभिप्रेत असतो पिस्टन, चाकें, रूळ रासायनिक मिश्रणें, नलिका, वीजेची गाडी, आगिनगाडी, रस्ता दाबणारें एंजिन, खडी, धुराडीं, चाळींचे डोलारे, अणु-बॉंब, हायड्रोजन बॉंब, यांचा वापर त्यानें सदाच करावा हें म्हणणें या अर्थानें अज्ञानदर्शक होईल. नवीनता ही नव्या प्रतिमांतून जशी येते तशीच ती जुन्या वाङ्मयांतील, महाकाव्यांतील प्रसंग वा पात्रांचा प्रतीकरूप उपयोग करून नवीन अर्थ काढण्यानेंहि उत्पन्न होते. नव्या अनुभूतीशी आणि तिच्या अभिव्यक्तीशीं निगडित असलेला नवा अर्थ हाच नाविन्याचा दर्शक असतो. नवीनता ही अर्थावर अवलंबून असते. नुसत्या प्रतिमांवर नाहीं. कारण अर्थ हाच आत्मा. प्रतिमा हें शरीर.

— ८ —

नवकवीला, अनुभूती घेतांना आणि तिची अभिव्यक्ति करतानां सर्वच्या सर्व कविव्यक्तिमत्व जागे, कार्यप्रवण करावयाचें असतें. त्यामुळेंच तो समाजोन्मुख असतो. मार्क्सनें मांडलेल्या आणि हेगेलला अभिप्रेत असलेल्या त्याला मांडलेल्या दोन कल्पना त्याला त्यामुळेंच सर्वथैव संमत असतात. त्या दोन कल्पना म्हणजे (अ) ज्या वैचारिक मीमांसेची जीवनापासून फारकत झालेली असते ती मीमांसा निरर्थक तर असतेच पण ती असिद्धहि असते. (ब) तत्त्वज्ञानाचें ध्येय, जगताचा वा संसाराचा, आरामखुर्चीत पडल्या पडल्या नुसता अर्थ लावणे, एवढेंच नाहीं तर जग वा संसार बदलून टाकावयाचा होह आहे

त्यामुळें नवकवीची कलापूजकता ही निष्क्रिय स्वप्नाळूपणाची नसते. ती वास्तवपूर्ण असतेच आणि पुरोगामीहि असते. पुरोगामी दृष्टीनें विचार केला असतां आज मुख्यतः जे कांहीं टिकवावयाचें आहे तें म्हणजे ‘ मानव्य ’ होय. शास्त्रांतील शोध जडजीवन समृद्ध करतात मानवाला शारीरिक सुखें आणून देतात. पण या निर्जीवतेच्या संख्यावाढीत माणसाचें **मनुष्यत्व** नष्ट होत चालल्याची चिन्हें दिसूं लागलीं आहेत. याचा मोठ्यांत मोठा धोका म्हणजे मानव हा Erewhon मध्यें वर्णिल्याप्रमाणें एक यंत्र किंवा यंत्राचा भाग बनेल. निर्जीव संख्यावाढीला नुसता सहाय्यक होईल. ही जाणीव नवकवीला यथार्थपणानें झालेली असते.

त्यामुळे नवकवि साहजिकच मानवतेच्या मूल्याचा पूजक असतो. आजच्या जगात मानव्याची जी बेअब्रू चालली आहे ती त्याला पहावत नाहीं. मानव्याची बूज राखायाची असेल तर आजची दोषपारिप्लुत समाजरचना बदलून टाकून दुसरी नवीन समाजरचना घडावी अशी त्याची तीव्र मनीषा असते. त्या नव्या समाजात मानवाला विचारस्वातंत्र्य, विचारांची अभिव्यक्ति करण्याचें स्वातंत्र्य असावें, आर्थिक बाबतींत तो गुलाम नसावा, अगतिक नसावा. त्या समाजांत मानवाला सर्व संधी मिळून आपली सर्वांगीण उन्नति साधतां यावी.

पण ही कल्पना, हें ध्येय प्रत्यक्षात उतरण्याच्या आड आजची समाजरचना येत असल्यानें त्या समाजरचनेवर तो हल्ले चढवितो. आज ठायीं ठायीं दिसणाऱ्या अगतिकत्वाचें कारण भांडवलशाही असल्याने तदनुषंगाने येणाऱ्या व आलेल्या सर्व प्रतिगामी आणि भयानक गोष्टींचा तो कट्टर वैरी असतो. जीवनांतील मांगल्य व सौंदर्य शोषून घेणाऱ्या सर्व गोष्टींचें स्वरूप तो उघडें करून दाखवितो. त्याला समाजांतील, रोगी, भेकड मनोवृत्तीची उबग येते. त्यातून संतापाचे फटकारे वा ठिणग्या बाहेर पडतात. नवकवि हा सौंदर्याचा, मांगल्याचा व सृजकतेचा मौलिक भक्त असतो. कारण यांवाचून मानव्याला मानव्य हें नांवच यथायोग्य राहणार नाहीं, हें त्याला ठाऊक असतें. त्याला खरें सौंदर्य व मांगल्य आणि सृजकता ह्याची जाणीव असते; आणि तो त्याचाहि पूजक असल्यानें त्याच्या मनाला समाजांतील कुरूपतेचें दर्शन आत्यंतिक

स्वरुपांत होतें. नवकवीचा हल्ला कुरुपतेवर असतो; रोगावर असतो; आणि त्यांचें स्वरुप तो उघडें नागडें करून दाखवितो. सौंदर्याचीं, शिवाचीं मांगल्याचीं, सृजकतेचीं, मानव्याचीं मूल्यें तो मानतो. तीं आजच्या जीवनांत उतरावीं ह्यासाठीं त्याचा आटापिटा असतो. कारण त्यांविना जीवन हें सहाऱ्याचें वाळवंट, मरूभूमि बनेल; आणि मग त्याला वर विस्तृततेनें विवेचलेली अनुभूति यथार्थ घेता येणार नाहीं याची त्याला पूर्ण जाणीव असल्यानें त्याची सामाजिक जागरूकता ( Social Consciousness ) अत्यंत तरल वा धारदार असते. जें जें प्रतिगामी किंवा अधोगामी असेल त्याचा त्याला तिटकारा असतो. संकुचित राष्ट्रवाद, धार्मिक-वेडगळपणा, अंधश्रद्धा, कोंजो विचारसरणी, कोणत्याहि स्वरूपातील हुकुमशाही यांचा तो कट्टर वैरी असतो. यासाठीं त्याला एका प्रकारचें आर्थिक प्रजासत्ताक हवं असते. ज्या समाजव्यवस्थेंत व्यक्तीला आपलें व्यक्तिमत्व सर्व तऱ्हेनें फुलविता येईल, तीच त्याला प्रिय असते. कारण त्यावाचून मानव्याच्या मूल्यांचा उच्चारहि निरर्थक. नवकवीची मानव्यादि मूल्यावरची निष्ठा अत्यंत कडकडीत असल्यानें तो एका विशिष्ट अर्थानें 'आस्तिक' असतो.

—व. द. भावे.

# अनुक्रमाणिका

# तेजोवलया !

धडधडत्या होमकुंडांतून
जन्माला आलेल्या तेजोवलया
आणलास संगें विराट नाश
उडाले सुरुंग धरटीं खाक
थयथयलीं रक्ताचीं कारंजीं
रपरपला मांसाचा चिखल
तारामतींचा झाला ना विक्रय ?
दीन सैरंध्रींची घोर विटंबना ?
तरीहि अर्चना तुझी न सोडूंच.
तेजोवलया, तेजोवलया,
पातलास तूं घेऊन रूप
प्रलयस्वरूपीं कुष्ठी योग्याचें
आणि मागतोस चिलया पक्वान्न !
जाणतोंच आम्ही तुझें साच रूप.
सती चांगुणा गाईल पर्यंद
उखळीं घालून कांडील चिलयां
बनवील पाक, आणि श्रियाळही
भोजना बसेल तुझिया सांगाती
साच मग तरि दावशील तुझें
मांगल्यरूपाच्या शिवाचें सृजत्व !

*

२

# जसा क्रूसावर

झोंपेवांचून तळमळणाऱ्या
भारावलेल्या दीन यामिनीचीं
हिसळलेल्या मूक दुःखांचीं
अर्धवलयें पूर्ण वलयें—
आदळतात मनकांठावर;
रितें करतात आपुलें ओझें
माझ्या भावनांच्या विरल्या झोळांत.
अर्ध गाईलें डोहाळ्यांचें गीत
फेंकतें बाहेर उरली मूकता
अधू झालेल्या गर्भाशयांतून
अपुऱ्या दिसांचें जसें बाळक.
आणि सदाचा—
अंतरात्म्यांत लोंबलोंबतोस तूं,
जसा क्रूसावर जीजस ख्रिस्त !

*

# सूर्याच्या भट्टींत....

सूर्याच्या भट्टींत   लाल तापलेल्या
भूमीवरती   उभ्या राहिल्या
मानव रांगा   भकास्सलेल्या
हातांत घेऊन   रित्या बाटल्या
आणि सगळ्या   पिशव्या ठिगळ्या.
रेशन शॉपच्या   बंद स्वर्गापुढें
खंगून गेलेले   तिष्ठति पापात्मे !
मरतुकड्या   त्यांच्या देहांतून
घाम निथळतो   घाम निथळतो
थबथबतांना   गायन करतो,
" चिमणे चिमणे   दार उघड
पाणी दे दाणा दे   दार उघड "
रेशन शॉपच्या   बंद स्वर्गापुढें
घाम निथळतो   घाम निथळतो
लाल तापल्या   भूमीवरती
तडकून जाते   भूमी तडतड
घर्मबिन्दूची   बनते वाफ
फुसफुसते ती   भैरवी गान
" चोरांच्या   पुढाऱ्याचा मंत्र
सांग अलिबाबा सांग लवकर ! "

*

# चांदण्यांचा चुरा !

आज मी एकला
अगदीं एकला
लाल क्षितिजाची जिव्हारी धार
करते छेदन अखंड अनंत अवकाशाची.
गळूं लागतो
चुरा चांदणी चांदण्यांचा चुरा.
आणि खेळतां कालकणांशीं उगवूं लागतें
सुरकुत्यांचें दाट दाट पीक
मनतनुवर.
कुठून तरी होतो शिडकाव
मोहिनी द्रवाचा
गुंगीचा फवारा... ... ... ...
आणिक मग,
निद्रासंचार कांहीं निद्रालाप अर्ध पोकळी हवेच्या
लाटांत.

अर्ध पोकळी हवेच्या लाटांत—
परावर्ततात प्रतिबिंबतात,
तेज-फलकांचे निद्राभ्रमणी मंदाकिरण
द्वंद्वगीतांची दांहिवरलेली गूढ कुजबुज
अर्ध पोकळी हवेच्या लाटांत—
धुंगीच्या नादांत वेटोळलेला इतिहासाचा प्रवाह
झोंपतो.

निखूं लागतात खास खास अंक काळ्या निराशेचे.
उपासमारीला मिळतें काम गणीत-श्रेणीनें.
नाचूं लागतात हर्षभरानें असंख्य कबंधें.
धूमकेतूंच्या ज्वलंत शेपट्या
एकमेकांवर करतात वार निर्घृण अदय.
खोबणींतून निखळतात चांदणी तारे.
तारकांचा सडा चांदण्यांचा सडा
चांदण्यांचा चुरा !
अर्ध पोकळी हवेच्या लाटांत—
चांदणी चुऱ्याची तीव्र काहिली भटावयासाठीं
अवकाशाला.
व्यक्त वास्तवाची आर्त तळमळ
अव्यक्त बिंबाच्या मीलनासाठीं.
अंतरंगांतील अनंताच्या भेटी
शलाका आर्त शलाका आर्त चालल्या जळत... ...
निमिषार्धांतच,
जळका चटका हातांत धरल्या सिगारेटचा
आणि मी एकला पाहतों डोळ्यांनीं
चांदणी चुऱ्यांत अदृश्य झालेली
वर्षाऋतुची लाडकी सखी हवा वादळी
विवस्त्र झालेली !

*

# वीजेच्या चापल्यानें-

वीजेच्या चापल्यानें
वास्तवाचीं चित्रें टिपून घेणारी
हळवी सचेतन कांच
अंतरंगाच्या अडगळींत
पडली आहे.
ती गंजलेल्या आवाजांत कुरकुरते,
" माझ्या हृत्पटावर प्रकाशानें कोरलेलीं
सजीव बिंबें
बघ, पुसटून चाललीं.
कांहीं बागुरडें इकडून तिकडे
आपल्या लांब लांब मिशा
त्यावर पुशीत
आरामांत हिंडू लागले आहेत.
कोळीबुवा
आपल्या अंगांतून
चोरटे धागे
काढण्याच्या विचारांत आहे.
रासायनिक द्रव्यांत मला तूं
कधीं बुचकळशील?
हृत्पटावरील बिंबाचें
रूपाविष्करण कधीं होईल?"
मनाची मुद्रिका उत्तरादाखल

कांहीं गुणगुणणार तोंच—
सुस्कान्यांनीं वाफाळून गेलेला
अश्रुबिंदूंनीं विदारलेला
दुःखाच्या खांच।खळग्यांनीं भोकाळलेला
माझ्या खिडकीखालचा रस्ता
उघड्या खिडकींतून आंत येतो
आणि धापा टाकतो—
" माझ्या या जखमा
तुला उमगतील तेव्हां ! "

*

# हुंगून हुंगून--

हुंगून हुंगून सोमरसाचे मोहिनी बिन्दू
अगदीं बेहोश पडली आहे सुंदर यामिनी.
मनांत माझ्या चाललें आहे
कसलें तरि अज्ञात ' शंटिंग '
अन् कुठेंतरी अस्ताव्यस्तलेले बाजूला गेलेले
स्मृतींचे डबे येत आहेत एके ठिकाणीं... ... ...
शुभ्र सिमेंटच्या ताजमहाली
पार्श्वभूमीवर
झोपडीचें दार विचकतें आहे आपुला जबडा
अन् डोकावते
चोपटलेली चिंधावलेली
गिरणीमधली कामकरीण.
हाडांच्या तिच्या खोबणींमधून
फडफडतात डोळ्यांचीं दोन
भकास बुबुळें
अगदीं निःशब्द पुटपुटतात
कांहींतरी गूढ;
आणि एकदम उभें ठाकतें
विश्वरूप दृश्य—

धुराच्या लोटांत
अग्नीच्या लोळांत
अडकवून एकमेकांत दांते विद्रूप
काळीं पोलादी चक्रें गर्कन्
फिरत आहेत
पऱ्या पिस्टनच्या तांडव तालांत
चाखत चाखत
रक्ताचें वंगण !



# काळ्या रात्रीच्या--

काळ्या रात्रीच्या बोगद्यांतून
मंगलाचा तारा
पहांटेला घेऊन आला आहे.
आणि ती पहांट
सजीव दंवबिंदूंची
शिंपण करूं लागली आहे.

रस्त्याच्या एका बाजूला उभा असलेला
वीजेचा दिवा
धनऋणाच्या मीलनाचे सौख्य अनुभवीत
आकाशाकडे पहातो आहे
आणि त्याला
प्रकाशतत्त्वाच्या संवेदनेची अनुभूती
होऊं लागली आहे.

रस्त्याच्या दुसऱ्या कडेला असलेला जलाशय
अंगावर पडणाऱ्या दंवबिंदूंत
आकाशांतल्या अनंततत्त्वाची प्रतिबिंबें

एकाग्रतेनें पहात आहे.
आणि अंतर्मनांतून
जागून उठलेलीं
प्रकाशवलयें
लाटालाटांतून डोकावूं लागलीं आहेत.

आणि......
सारी अस्मिता
वीजेच्या दिव्याच्या जाणीवेंतून
जलाशयाच्या अनुभूतीचा उपभोग घेत आहे.



# छापयंत्रांतून--

छापयंत्रांतून जन्मतात जशा
सलग सुलट सुलट ओळी
जरि खोबणींत उलटे ठसे,
वाटतें तसेंच भविष्यकालांत
उलटें जीवन होईल सुलटें
जरि वास्तवाच्या क्ष-किरणांत
दिसतें जीवन उलटें उलटें.
  अनावश्यक पण मक्तेदार वीजप्रवाहाचे
  वीज ओघावर जड अवजड लादतात ओझें
  उडतात सदा संयोगी वाती.
  छापयंत्राला येतो झटका
  विखुरतात जुळलेले ठसे
  जमिनीवरती.
आणि सदाची—
मक्तेदारांच्या,
शिव्यांनी जखमी
स्तुतीलोभनांनी गोंजारलेली
पेंगुळलेली पुनःपुन्हांची
जुळवाजुळव

“ ‘ गाढवहांच्या
पायानें ढोसतो आणि धरतो
गाढवाच्या पुढें
काठीला बांधली गवताची जुडी
धावतो गाढव
धावतो सदाच
खावयां गवत ! ”



# वेळ जाईना !

शास्त्रक्रियेनें थंड्या केलेल्या कांचेच्या खोलींत
रंगीत बोटें उचलतात नाजुकतेनें
गवती नळी.
निळया पेल्यांतून जास्वंदी ओंठ गवती नळीनें
चुंबू लागतात कोमलतेनें गार शर्बतें.
परी मधेंच हळूं गुंजतात ... ...
कंटाळलें बाई ... ... वेळ जाईना !
कुठें जाऊं आज ? मेट्रो कीं इरॉस ?
व्हाईट वे लेडलॉ ... ... ?
नव्या फॅशनी, रंगसंगती,
काश्मीरी गुलाब ... मदन बहार,
कंटाळलें बाई ... ... वेळ जाईना !

वेळ जाईना ... ... वेळ जाईना !
काळ्या डांबरी वितळुं लागल्या रस्त्यावरचे
बेकारांचे तांडे, हाडांचे सांगाडे घुमुं लागतात
वेळ जाईना !

उरलें सुरलें जळतें मांस, जळती केंस
तयांची दुर्गंधि लागते श्वासूं
वेळ जाईना ! वेळ जाईना !

*

# वीण तूं --

आतां तुटेल मग तुटेल
अशा आशातंतूंत
भेसूर भडक माझ्या जखमांची
फुलें ओंवून केलेली मालिका
आज मी
तुझ्यासाठीं आणली आहे.
ती गळ्यांत घाल;
आणि उगवतीच्या धोत्र्यावर
अर्ध उमलत्या हंसतमुखी सुषमालालीचे
नि चंद्रचर्ख्यावर काल काढलेल्या अमृततंतूचे
आडवे उभे धागे जुळवून
उद्याउद्यांच्या वास्तवतेसाठीं
तूं वीण, आंतरतेजी वस्त्रें वीण.
माझीं फुलं भेसूर भडक जखमांची असलीं
तरी बावरूं नकोस.
तूं सुरवात कर वस्त्रें विणायला.
सुस्कुतलेली गवताळ माती
अक्रोडलेल्या झाडाच्या फांद्या
खुळखुळणारीं इवलीं रोपटीं
तुला किनई तेंच सांगत आहेत
सुरूं कर तूं तुझें विणणें.

तुझ्या धोऱ्याच्या लयींत—
नादावलेली गवताळ माती,
गुंगून गेलेल्या झाडाच्या फांद्या
एकतानलेलीं लहानगीं रोपटीं
कात टाकतील;
नव्हाळीच्या पालवींत डंवरून निवतील
उजाड तमांत उपभोगलेली
नग्न निर्लज्ज आत्मविवशता
बिळांत जाऊन आत्महत्त्या करील.
भ्रमपटलें दूर झालेला आदित्य प्रकाशूं लागेल
निळ्याच निळ्या स्फाटिकेंतून.
आणि मग,
जीव धरतील माझे आशातंतू
भरून येतील माझ्या जखमा
अश्विनीकुमारांनीं हात फिरविल्यासारख्या.
लौकर वीण आंतरतेजीं वस्त्रें
सुषमालालीचा आणि काल काढलेल्या चंद्रकिरणांच्या
धाग्यांचा ढीग वितळून जाण्याच्या आधीं
विणून काढ तूं वस्त्रें
वीण झटपट लौकर वीण आंतरतेजीं वस्त्रें !

*

# आतां कशाला ?

धुळीचे मेघ दाटले नभांत
विकल विव्हल...
गुदमरलेले श्वासतरंग
आसमंतात.
पिवळ्या वाळल्या पर्णांवरती
फुलचिमण्यांचीं निर्जीव शरीरें
चुरमडलेलीं !
अन् मातींत शिरीषकुसुमें
सुरकुतलेलीं !
कोरड्या घशांत शब्द दाटतात
विशाल काळ्या काळ्या नेत्रांतून
आतां कशाला अमृतधारांची—
नजरफेंक ?

*

# धूसर अंधूक :

धूसर अंधूक चांदणी प्रकाश
वास्तवाचें रूप अनिर्वचनीय अस्पष्ट गूढ
दडपलेलें मनांतील भाव जागे लागतात
गूढ-गुंजन,
भाव-आंदोलन.
वसंत ऋतु जन्मतो पुन्हां—
शिवानें जाळल्या कामदेवाच्या सुस्कार्‍यांतून
आणि रतिच्या रुदनांतून
टिपकतात धूसर अंधूक
दंवाचे थेंब;
कुंद कुंद व्योम जातें कातरत...
" तुझी माझी भेट शुक्रचांदणीच्या प्रकाशझोतांत "
गुदमरे श्वास, मनगव्हरांत रुद्ध रुद्ध गीत.
धूसर अंधूक चांदणी प्रकाश
धरतो ताल करतो साथ
मिसळतात शून्यामध्यें शून्यें !

*

## गजाआडच्या--

त्यांच्या मनांतल्या
गजाआडच्या सृष्टींत
असंख्य कैदी
वाळवीनें चिरफाड केलेल्या जुन्या पुराण्या
लांकडी बाकांवर
ओळीनें बसले आहेत,
निर्बल झालेल्या त्यांच्या हातापायांतील
साखळदंडांचा खळखळाटहि, बधिरला आहे.
आसूडाचे फटके खाऊन खाऊन
त्यांच्या कातडीवर
घट्टयांचे उदंड पीक आलें आहे.
गुडघ्यांत ढोपर खुपसून
कपाळाला हात लावून
बहुत काल बसल्यामुळें
त्यांची गुडघ्यावरची
आणि कपाळावरची
चुरमडलेली त्वचा
घट्टयांनी फुलली आहे.
त्यांच्या डोळ्यांतल्या बाहुल्या
थिजल्यागत आहेत.
कुठल्यातरी

अबाढव्य आणि अजस्र
यंत्राच्या भट्टींत
जळण म्हणून वापरण्यासाठीं
त्यांना घेऊन जाणाऱ्या वाहनांची
पेट्रोलमिश्रित घरघर
क्षणाक्षणाला त्यांच्याजवळ येत आहे.
त्यांच्या मनाच्या बाहेरील
हिरवी सृष्टीहि
वाळून कोळ झाली आहे.
आकाशांतल्या ढगांतून
जीवन पडण्याऐवजीं
राख पडूं लागली आहे.
आणि त्या भाराखालीं
तापलेल्या पण निष्क्रिय
अश्रूबिंदूंची
दीनवाणी धुसफूस चालू आहे.

*

# फ्यूज उडाले

वीजवाहक तारांच्यावर
मेघ धुक्याचे दाट सांचती
धुकाटलेल्या फांद्यावरून
फुटके आंसू गळूं लागती.
चंद्रकिनारीं नाजुक शिवणी
काळाच्या मग उसवुन जाती,
आणि रातच्या मनच्या व्योमीं
चमकुं लागती कितीक तारे
निखळुन सारे खळकन् पडले
शिरा वांकड्या अवकाशाच्या
थंडीनें जाधिं गोठुन गेल्या.
वीजवाहक तारांच्यावर
मेघ धुक्याचे दाट सांचले
आणि पटकन् उडून गेले
उबगून गेल्या फ्यूज मनाचें !

*

# हे मनस्विनी !

हे मनस्विनी,
पडल्या पडल्या हात जरासा लांब करून
दे तूं भरून
कांठोकांठ पेला वहात्या तेजाचा !
पारदर्शी निद्रा… …
घालते जादू तुझ्यावरि हळूं.
रमशील तूं निमिषार्धांत
जागत्या विश्वांत निद्रेमधल्या.
अन् अनंताच्या वलयांमधल्या
तेजकिरणांशीं … …
खेळूं लागशील झिम् झिम् झिम्मा !
हातांत माझ्या दे तूं चटकन्
भरला पेला वहात्या तेजाचा !
लावतां तो ओठीं… …
ओढली जातील बाह्यार्चीं बटणें,
फिरतील आंत परावर्तक माझ्या मनचे.
जडामधील सचेतना मग
करील हास्य विशुद्ध हास्य
सजीव अणूंचें.
दे चटकन्, दे तूं भरून
हे मनस्विनी,
कांठोकांठ पेला वहात्या तेजाचा !

# सांग कसे आतां जुळवूं या ओंठ ?

स्वप्नीं गुंगलेल्या गुलाबफुलांच्या आणि सुगंधी
चंपकसुमांच्या
पहिल्या वहिल्या पहांटवेळच्या गोडगोडशा
उःश्वासितांत,
आणि लाजऱ्या जललहरींच्या किनाऱ्यावर
हिरव्यागर्द गालिचावर
जीवनरसानें थबथबलेले जुळले ओंठ—
प्रेमसमाधींत.
घडलें तें सारें
कालबालकाच्या रम्य पहांटेस:
आणि आज भेटतों आपण
वाळवंटाच्या लाजलहरींच्या
भकासलेल्या गालिच्यावर.
गंगावनाच्या मुळ्यांमधून
लोहपिनांच्या कुंपणांतून
डोकावतात
रंगीबेरंगीं कागदी फुलें.
कानांत लोंबती चिमणीं घुगुलें,
सपाटलेल्या उराडावरच्या
गळ्याखालच्या खोबणींमध्यें
व्याकुळतेच्या टाकतात धापा.

आकाशांतलें
सूर्याचें बिंब बनलें आहे खिळयांचें डबडें:
आणि गुंगले
भेसूर हास्यांत मैलच मैल उलटे लोंबते
रिकामे खिसे.
निर्जीवतेच्या सजीवतेंत
सांग कसे आतां जुळवूंया ओंठ ?



# अश्रू आणि इंद्रधनुष्यें !

व्योमदर्पणांत
दूरावलेलों भेटतो आपण
बऱ्याच दिसांनी.
वायूमिश्रित पेयाची बाटली फोडली असता
जसें उसळतें कोंडलेलें जल
तसें कांहींतरी होतें मनांत .........
संध्यासुंदरीच्या विविध अस्फुट प्रकाशाकडांच्या
मऊ मांडीवर टेकून डोई
खुशींत पडला निवांत बंगला
मिष्किलपणानें सोडतो धूर.
भरून चाललें संध्येचें मुख
खेऱ्या रागाच्या छटाछटांनीं.
इकडच्या बाजू,
अंतराळांत पसरूं लागले अंधूक तारे;
चंद्रचिताऱ्यानें झाडला कुंचला
खोडी काढायां पाठीपाठीशीं रेंगाळणाऱ्या
सखीपूर्वेच्या
तरारतात शरीरकण
पण मातीकण
स्थलकालाच्या मर्यादेचे बंदी.
लहानपणीं भातुकलीचा खेळलों खेळ......

मांडलीं होतीं माझीं स्वयंवरें
आणि लावलीं कितीक लग्नें सगळीं तुझ्याशीं.
तरारतात शरीरकण
पण मातीकण स्थलकालाच्या मर्यादेचे बंदी.

नको असें पाहूं केविलवाणें...
घोंटाळतो पहा कुणी एक मेघ
चांदणीतेजांत न्हाउन निघाल्या पूर्वेजवळ.
वाऱ्याचा झोत नेईल मेघाला
दूर कोठेतरी.
जाईल मेघ पहात मागें मागें परतून.
कालाकालाच्या अवकाशांतून उठेल जागून
अचानकतेची वीजशलाका.
मेघामधून टिपकतील
टपकन् अश्रूं टपकन् अश्रूं
नि रंगीबेरंगी
इंद्रधनुष्येंहि !

# माझ्या डोईवर :

माझ्या डोईवर—
टेकाडावरच्या निवांततेच्या अवकाशांत
जमतो आहे
उद्याउद्यांचा जीवन उन्मेष.
आणि जवळचे प्रचंड वृक्ष
लहान झुडुपें
गांगरलेलें भित्रें गवतहि
कान आपुलें टवकारून माना उंचावून
अनुभवतात
उत्फुल्ल तनुची उत्कंठ आंत
नवजीवनाच्या मीलनाची आस.
पायथ्याखालून—
आगगाडीची कर्कश शीळ घेउन येते
काळ्या चिमण्यांची धुसफुसलेली आदळ आपट
चाकाचाकांची मत्त गुर्गुर
खिळ्याखिळ्यांचा भितरा राग
तीव्रतीव्रतेची कांहीं चुकचुक
कुंद हवेलींत सुंद संख्यावाढ,
“ एक लिंबू झेलूं बाई

दोन लिंबू झेल्‌दू "
तीन चार पांच लाख आणि कोटी
परार्धाविनाची परार्ध शून्यें
झेल्‌दूं बाई झेल्‌दू लिंबें झेल्‌दू ... ...



## विसावा--

मधुहासिनी शुक्रचांदणी
विरल धुक्याचें टाकून वस्त्र
निळ्या जळांत डुंबडुंबते.
नाजुक लहरी कुजबुजताती
मोतियारंगी किनाऱ्याच्या कानीं.
वळविते मुख जाईची वेणी
बहरुन गेल्या मोगऱ्याकडे.
क्षितिजें भेटतीं क्षितिजें भेटतीं
अन् विसावती,
संध्येच्या लाल वेदनेच्या उर्मि
चंद्रतेजाच्या हर्षमिळणींत.



## तेवढेंच कांहीं--

आकाशांतील मुकाट तिजरा
घडवंचीवर
लावून नीट विविधरंगी ढगांच्या फायली
नि ऑफिसांतलें संपवून काम
पिकटलेला पिंगळा सूर्य
निघाल्या पिवळ्या पश्चिमेकडे

जाऊं आपण कोठल्यातरी स्वस्त हॉटेलांत
पिऊं सिंगल
मी ओढेन खाकी
चघळ चघळ तूं दिडकीवाली सुगंधी सुपारी
नि ऐकूं तेथेंच रेडिओमधलीं
कट्यारमारी मदनगीतें.
खुंटीवरच्या कोटांत किती पहा शिल्लक
कां अशी गप्प ?
बसूं या इथेंच ?
बसूं जपून अन् चुकवून सगळीं भोंकें
भोंकांनीं विणली वडीलोपार्जित अपुली बैठक
भोंकें ठिगळें ......
न दिलेलीं बिलें :
तुपाळ गप्पा
शिळ्याच वडीशीं

चघळल्या गोड
चघळतेस जशी कधीं मधीं
तूं अर्धकिडकी सुगंधी सुपारी
पहा आकाशांत
एक काळा मेघ टंकयंत्रापरि ...
वाटतें तुला झालों मी वेडा ?
बघ बोथटलीं निमुळतीं बोटें
कलावंतापरि होतीं तीं मागें.
टक टक टक विषारी थंडींत
वर्षानुवर्षें उकड्या हंडींत
आणि पगार ?
न दिलेलीं बिलें.
पहा झोंपला चावट सूर्य पश्चिमेच्या गृहीं
पडला अंधार.
' स्पेशल डयूटी ' रातपाळी आज
टक टक टक बोलेल यंत्र
लागेल तंद्री.
भेडसावतील हप्ते चुकलेले न दिलेलीं बिलें
पुनः केव्हांतरी पगाराच्या दिशीं
करूयां यत्न सिंगल पिण्याचा
आणि मग बसूं निवांतपणानें
छाटत गप्पा वनवासाहून परतलेल्या
रामसीतेपरि !
रामसीतेपरि ?

स्वप्नांचे कपटें
ढोसले छडीनें लहानपणीं कांहीं पंतोजींनी
माझ्या मेंदूंत फडफडतात अधून मधून
तेवढेंच कांहीं—
चुकल्या हस्त्यांच्या न दिल्या बिलांच्या
माझ्या विश्वांत !



# घरासमोरील--

घरासमोरील लोहारदादाचें लोखंडी दुकान
आणि हातोडाहि
एक ... दोन ... तीन मोजीत अंक
जातो गुंगून गाढ निद्रेंत
मध्यरातच्या.
अशाच वेळीं अधेमधेंच
होतो मी जागा.
उडून जाते डोळ्यावरची झोपेची परी,
लांबच लांब कंटाळवाणी
भुंकू लागते रात्र चावरी
या कुशीवरून त्या कुशीवर आणि उताणा
आठवतो मी लहानपणीं वाचलेली कथा
धान्यकोठाराच्या फटीमधून
धान्याचे दाणे चोचींत धरून
उडूं लागते पक्षांची रांग
एक ... दोन ... तीन ... एक ... दोन ... तीन
निवून जाते वाऱ्याची चाहूल
विझून जातो चंद्रप्रकाश.
एक ... दोन ... तीन
विणूं लागतो जाळ्यामधून
चित्रें एक कोळी—

गिळून टाकून लठ्ठ उंदीर
गटारांतला काळाकुट्ट बोका
फुगूं लागतो फुगून बसतो
गटारांतल्या घाण पोकळींत
एक ... दोन ...तीन ...
ताठून गेली हाडुकें बनली
पिवळी आंतडीं घालतात फेऱ्या
अस्थिपंजर कावळ्यापाशीं
मागत आली, " आळी दे आळी दे "
एक ... दोन ... तीन ...
कडकडकड दांत वाजवीत
काळ्या सांवल्या नाचूं लागती
रिंगण धरती पिवळ्या झाल्या
आंतड्याभोंवती.
एक ... दोन ... तीन ...
वखवखलेल्या कवट्यापासुन
सुटून उडाले केस पुंजके
खद्खद्त जाळीं विणती
फुटकें गगन भरून टाकती
जाळी जाळी जाळी कोळियाची जाळी !
एक ... दोन .. तीन ...
होऊं लागतो जीव घाबरा
असह्य वेदना उठते कळ
येते जागृति.

बावरलेला मी पाहूं लागतो
अंवती भंवती ... ...
खिडकींतून वारा आणतो
कातळावरील थोडीशी चंदेरी
प्रकाशकिरणें पहांटेवेळची
आणि लोहाराच्या ऐरणीवरचे
ठकाकणाऱ्या हातोड्याचे नाद
एक ... दोन ... तीन
निद्रेची परी करते जादु
साखरझोंप !



# येतें वारें, जातें वारें !

अधू बरगडी—
कृमि आळ्यांच्या पर्यंकावर.
वैद्य फुंकतो
नळीनळींतून जीवनवायु.
आणि तो वायु ...
पोकळींतून अडखळणाऱ्या पावलीं येतो
बरगडीला म्हणूं लागतो ...
" जवळ घे तूं,
जवळ घे तूं ... "
बरगडीचें तोंड वांकडें !
निस्कारलेला जीवनवायु
जड पावलीं निघून जातो,
नळीनळींतून उठतो ध्वनि ...
येतें वारें,
जाते वारें !

*

## विखुरत रंग--

विखुरत रंग लाल मेंदीचा
धुंद सुगंध अन् रातराणीचा
लेवून वस्त्र शुभ्र चांदणी
आणिक उधळीत हिरे माणकें—
गेलीस काल दारावरून
मत्त यामिनी, अगदीं सहज.
आणि आजच्या प्रभात कुंडींत
गळून पडल्या कळ्या गुलाबी !

*

# जरी झोंपला

जरी झोंपला अजुनी भास्कर
गगनामधल्या बावन खाणींत—
हातांत घेउन भाकर तुकडा
वीज गाडींत फेंकुन द्यावा
देह आपला.
आणिक त्याला भोंगा मारित
घेउन जाइल भुंडी गाडी
उंचउंचशा काळ्या दगडी—
इमारतींत.
यंत्रावरती पट्टे फिरतील
यांत्रिकतेच्या तांत्रिकतेंत
मागें पुढती हात हालतील;
मेंदुतल्या अन् यंत्रामधलीं
भुंडी चाकें गाडी फिरवतील.
आणि शेवटीं...
ढगामागच्या बावन खाणींत...
पुनश्च जाईल छाकटा भास्कर !

*

## कधीं थरकांप--

कधीं थरकांप कधीं धडधड
याविना भावना दुज्या कसल्याहि
नाहीं उगवत
मनोभूमीवर...
कुतुबमिनारी गिरणीमध्यें
यंत्रें अवजड गात आहेत
पूर्ण तालबद्ध आणि लयमय;
साधत आहेत तरल आरोह;
सूक्ष्म अवरोह;
येतात समेला आळवितात
आव्हानपूर्वक तेंच तेंच गान —
" रावण राजा विजयी झाला
जखमी जटायु पंख छेदलेला धुळींत पडला
रावण राजा सीतेला पहा घेऊन चालला
कोठें तुमचा कोदंडधारी लपून बसला ?
लपून बसला ?
उबग आली जखमी मनाला
दृष्टि फेंकिली गगनाकडे मोठ्या आशेनें
पण क्षणांत माझें अंधारून गेले नयन...
सूर्याची चूड पेटवितें व्योम
आसमंतात

वखवखलेल्या तांबड्या ज्वाळांच्या
वळवळतात विषारी जिव्हा
नि विष ओकत आळवितात
मदोन्मत्तपणें भीषण गाणें—
" अश्वत्थाम्याचें संहारक अस्त्र
जाळितें गर्भ पांडव स्त्रियांचा
अणुस्फोटक अणुस्फोटक
घालतात वीण,
कोठें तुमचा सखा श्रीकृष्ण ? "

*

# समुद्रतुषारीं

समुद्रतुषारीं नेसून वस्त्र
रात चांदणी
आतांच येईल रसरसलेल्या
क्षितिजांतून
घेऊन येईल लबाड पवन
हिरव्या हिरव्या फांद्यांमधून
टिपकणाऱ्या रजतकणांतून
कांहीं कुजबुज कांहीं गुणगुण.

मरगळलेला तरारेल मग तरारेल मग
दारीं निशिगंध ... !



# अहिल्येचें गाणें

अशीच असते
बऱ्याच दुःखी विद्धांची रीती —
मऊ रेशमी शब्दकुसुमांना झालर चांदणी
लावून भर्जरि
नि दिलरुब्याची घेऊन साथ
जाई फुलांच्या मंद सुखद सुगंधापरि
गोड आळवाव्या
तरल कोमल रागरागिणी;
अन् घालवावा दुःखवेदनेच्या ग्रहणाचा काल.
माझ्या आर्ततेला हृदयव्यथेला
किसलयतंतूसम कोमल
खडीसाखरी गानमाधुरींत
क्षणभरहि नाहीं विरंगुळा.
वाट पाहून ... वाट पाहून ...
युगायुगांच्या शिशिरऋतूंच्या निर्घृण थंडींत
कुडकुडली रे माझी काया
नि रापरापून गेली ती पोळून
निर्दय ग्रीष्मांच्या वडवानलांत.
गौतमा, गौतमा !
असंख्य पथिक येतांजातांना माझ्या मनाच्या
पटलाबरती

# कॅंसामध्ये

कॅंसामध्यें विणून घेउन
चंद्राचीं तीं कोमल किरणें
आणि हातांत घवघवलेले
जातिकुसुमी मादक झेले
अशीच स्तब्ध उभी रहा तूं
रविवर्म्यांची जणूं उर्वशी.
तुजला पाहुन लाल लाजतो
आकाशींचा मंगल तारा
शरिरावरती त्याच्या निघतो
गुलमोहरि जरि सुंदर काशिदा—
मनच्या कानीं घुमूं लागते
पुरुरव्याची हांक कांपरी
आणि दाबली जाते पिशाची
नेत्रामागचि अश्रुजळाची !

*

# वैराण पृथ्वीनें

वैराण पृथ्वीनें    डच्चू दिलेल्या
सूर्याचीं किरणें    रेंगाळतात.
लाल शेऱ्यांनीं    फराटलेलीं
पिवळीं पानें    'सर्व्हिस बुकाचीं'
पसरलेलीं    संध्यामेजावर;
आणि चालले    गटागटांनीं
कांहीं चिवचिव    किलबिल करीत
बचाइतीसाठीं    कमी केलेले
बेकार पक्षी.
पाय सरकावूं    अंगठा तुटल्या
वहाणांमध्यें    झिजून गेल्या.
रस्त्यावरचे    दगडटोणपे
टोचटोंचतील    तळपायांना
जशी धनकोचीं    सदावीं बोलणीं.
कोपऱ्यावरील    विश्रांतिगृह
पानपट्टीच्या    दुकानाची जीभ
लाल भडक    बाहेर काढून
वेडावूं लागेल—
"टुकटुक माकड    आम्हीं खाऊं पापड"
चिंधावलेल्या    हातरुमालानें
पुशीत पुशीत    फुटकी चाळिशी

जाऊं तसेच        पेदी श्रीमंताच्या आळशी ऐटींत.
आणिक रात्र        उघड्या करतां दिव्यांच्या जखमा,
कुबटलेल्या        ओलकटलेल्या
उशीसारख्या        वस्तूवरती
टेकूं आम्ही डोई
आणि... ...
विनानिद्रेच्या        बधीरतेंत
हांकलूं लागूं        मृत्यूच्या सांवल्या
पुटपुटत        निरर्थक मंत्र !



# मावळतीचा

मावळतीचा साखरचुंबा
घेउन निघतो तिमिरनाशक
तिमिरांमधला प्रवास करण्या.
पाय वाजती रस्त्यावरती
आणि मनाच्या पडद्यावरती
सरकुन जाती किती साउल्या.
सरकुन जाती विरून जाती
मावळतीच्या रंगित वलयीं
सीता चुंबे राममुद्रिका !

*

## पोरकी, पोरकी

पोरकी पोरकी दीनवाणी व्यथा
कर पसरून टाहो फोडते;
अव्यक्तांतून
लागतो किंचाळूं रडक्या सुरांत
भयसूचक कर्कश कर्णा.
घर्रर घर्रर विमान घारी
गगनामध्यें दाटी करतात.
आपलीं सावजें हेरून घेतात.
तडाड तडाड कडाडतात अग्निस्फोटक.
तुंगउत्तुंग कबूतरखाने
कोसळतात.
पृथ्वी आकाशांत कर्कश आर्तता... ...
मरणोन्मुख अभिमन्युबाळ
चक्रव्यूहांत.
नीतिस्वरूप महान् योद्धे अविचल चित्तीं पहात उभे
जयद्रथ नीच अदयविकट हाणतो लाथ
शिरावरती रक्ताने माखल्या
छिन्नल्या बाळाच्या
अभिमन्यूच्या !

*

# प्रकाश ऊर्मि

प्रकाश ऊर्मि संध्येच्या जधीं
विखरूं लागल्या सुगंधलहरी
तव नेत्रांतून जागून उठली
बीजशलाका आसुसलेली.

क्षणांत सगळीं टिपून घेऊन
सृजकतेची गूढ आर्तता
मनासमोरून नाचत गेलीं
नवीं क्षितिजें रसरसलेलीं
आणिक सुटलीं विश्वामधलीं
घनऋणाचीं कठीण कोडीं.

*

# अवकाशाची

अवकाशाची ओढ चुंबनी
हिरवा सिग्नल हिरवी हांक
घुसमुसणारी वाफ वादळी
भपापणारा लोट धुराचा
भिरभिरणारी चेपणकाठी
गरगरणारीं तुफान चाकें
आर्तलेली शीळ धांवती
कांपित कांपित गेली अंतर.
आणि ऐकिली सिग्नलांतल्या
लाल दिव्याची भेसुर खद्खद—
“ मुसाफिर हुशिय्यार
मुसाफिर हुशिय्यार ! ”

*

## हंसतो मार्क्स....

झिरझिरीत नाजूक रेशमी
चमचमणारी सुंदर टोपी
डोईवरती लेवून उभा
मंद निळसर विद्युद्दीप
मेजावरच्या एका कोपऱ्यांत
हांसतो आहे
आणि आसपास,
पडलीं गुंगून अलिंगनांत
पुस्तकें पुस्तिका —
दांतेचें कूजन शेक्सपियरच्या श्यामेच्या हृदयीं
होमर कविची अमर हेलेन मृदु श्वासते
हॅम्लेटच्या कानीं,
" उद्या आहे प्रिया मीलनाचा दीस. "
इलियटचें मरुभूमीचें भेसूर गीत
ज्ञानेश्वरीच्या अंतरंगांत.
कार्ल मार्क्सचें भौतिक विश्व करतें सलगी
शेलीनें निर्मिल्या अशरीरिणी सुंदरीपाशीं
—आणि मी स्तब्ध
पुतळ्यासारखा.
अस्ताव्यस्तल्या ग्रंथपुस्तिकांच्या
क्षितिजासमोर.

रस्त्यावरून
भिकारणीची हतबल हांक
येते मधेच...
जाते विरून
यामिनीपूजक तुस्तधनिकांच्या
धुंद वाहनांच्या गंध धुरोळ्यांत !
कळवळतें दुःखित मन
चढतो संताप
पण हॅम्लेट मनामधला जागा होऊन
निष्क्रियतेची मधुर अफू पाजूं लागतो.
" माया माया माया
कर्म ज्याचें त्याला चुकेना ! "
गाते अंगाई ज्ञानेशाची गीता.
शेलीहि फुंकतो तुतारी,
" जीवन माया ? मायाहि जीवन
त्यांतील जीवन प्रेमसौंदर्य..."
सौंदर्य ? प्रेम ?
भिकारणीच्या आक्रंदनांत ?
धनवंताच्या मगरुरीच्या
धुंद धुरोळ्यांत ?
वळतात मुठी, चढूं लागतें रक्त डोळ्यांत
शिरान् शिरा उभ्या राहतात.
" द द दत्त..."
फुटतें हांसू कार्ल मार्क्सच्या गालामधून ?

# हस्तनक्षत्रांतील रात्र

हस्ताच्या या धुंद सरींनी
चिंब भिजविल्या काळ्या काळ्या
तुझ्या दीर्घशा केसांमधुनी
चमचमणाऱ्या वीज छटांनी
गत जन्मींच्या सुस्तेंतुन
परावर्तला आठव स्पष्ट;
आणि पटली वादळलेल्या
समुद्रांतल्या राजपरीच्या
शब्दांची मग अंतर्साक्ष —
“ चिंब भिजल्या केसांमधुनी
गळतील जेव्हां वीजशलाका
तुटुन जातील दोघांमधले
सारे अडसर सारे अडसर ! ”

*

# डोंगरावरती

डोंगरावरती तुषार रुपेरी
दरीमधुनी चंचल वारा.
मधुररंगी छटा लाजऱ्या
गाल टेंकती गालावरती.
आणिक मग,
निळ्या पारव्या नयनामधल्या
होती साउल्या
गडद जांभळ्या !

*

## संध्याकाळच्या

संध्याकाळच्या स्वर्णकिनारीं
ढगाढगांतुन
पाउसधारा
भिजून जाते चिंबचिंबशी
मृत्तिकेची हिरवी चोळी...
–सळसळतो मग
तुफान ओढा!

*

# निदान एवढं तरी कर....

कोळिष्टकांनीं भरलेल्या
मेंदूंत किडे सदखदूं लागावे अशा किळसवाण्या
घाणीनें माखलेल्या
पडक्या झडक्या सराईंत—
अगदीं घट्ट डोळे मिटून
पायांची जुडी करून
कपाळाला हात लावून
किती युगें बसणार आहेस ?

काय करूं मी ?
सराईबाहेर, आजूबाजूला, खालींवरतीं
अंधकारानें साकारता घेतली आहे·
त्याच्या देहावर विजेच्या नागिणी खेळत आहेत
आणि तो आ वासून
मला गिळायला अगदीं सज्ज होऊन बसला आहे.
सराईबाहेर पडलों तर माझी कांहीं धडगत नाहीं.

पण...
उठून उभा तरी राहा
दीर्घश्वास घेऊन
मान ताठ करून

वर तर पाहा.
कदाचित्—
एखाद्या मोहिनीच्या स्वरूपानें वेडा होऊन
तिच्यासारखेच पदन्यास करीत करीत
स्वतःच्याच डोक्यावर हात ठेवून
अंधःकाराचा असुर
भस्म होत असलेला तुला दिसेल
आणि प्रकाशाचें संरक्षक कमल
सर्व विश्वावकाशाला झांकून टाकतांना
तुला आढळेल.
ऊठ, उभा रहा. वर तरी पहा.
उगीच कशाला कपाळाला हात लावून
किड्यासारखा या घाणींत वळवळतोस ?
भीति वाटते तुला ? अजून सुद्धां ?
मग एवढं तरी कर—
बागुलबुवाच्या भीतीनें गांगरून गेलेलें बालक
आईच्या कुशीच्या दुर्गांत दडल्यानंतर
जसें हळूंच आपले डोळे किलकिले करतें
तसें तरी कर माझ्या कुशींत लपून.
पण...
डोळे किलकिले करून का होईना
आजूबाजूला सराईच्या बाहेर
डोळे किलकिले करून का होईना
एकदां तरी पहा
एकदांच पहा...

*

# वितळतात बर्फाचे थर....

मृदु शिवरिच्या कापसापरि
नदीकाठच्या मऊ वाळूंत
शरीर माझें आहे विसावलें.
नीलरंगाच्या रुजाम्यावर नाचत आहेत
नखरेल कांहीं चटकचांदण्या
अन् तयांच्या जुईपावलांना चुंबचुंबणाऱ्या
चाळांचे संगीत
रुमझुमतें वातावरणांत
मनोमनांतील स्पंदनध्वनि
तरलपणानें मिसळतात
तयांच्या गूढमय झंकार नादांत
आणि वितळून चालले आहेत
बर्फाचे थर, स्मृतीचे थर
चांदणी तेजांत ... ...
झुळझुळणाऱ्या नदीकिनारीं
अनंत काल पडला होता
एक निर्जीव मातीचा कण.
आकाशगंगेची सुप्तली शक्ती
जशी फुलविते तेजकलिका क्षणाक्षणाच्या
अवकाशातून
तशीच अगदीं घेऊन चुंबनें सरितालाटांनी
केला तो सजीव मातीचा कण

घेतलें त्याने बियाण्याचें रूप.
फुटले त्याला कांहीं अंकुर.
अंकुरांतून आलें रोपटें.
अन् उगवली अरुणरंगी लाल कोंवळी
नाजुक पानें.
नदीजलाचें चोखून स्तन्य
आणि टिपून अवकाशांतून
जीवनवायु जीवनकिरणें
बनलें रोपटें डौलदार वृक्ष.
अज्ञातांतून आलें भुर्कन् लाजरेंबुजरें
कुणी पाखरूं.
लपलें हिरव्या हिरव्या फांद्यांत.
नि छेडूं लागलें गूढगुंजनी गानलहरी.
हृदयसागरीं उठती वृक्षाच्या जाईदलाच्या
मधुर वीची
अननुभूत वीजप्रवाह वाहुं लागतो
कणाकणांतून
आणि आसुसतें शरीर त्यांचें
विळख्यासाठी
नाजूक मऊ उबदारशा.
एके दिवशीं अभावितपणें
मुग्धलतिका वेटाळूं लागते त्याच्याभोंवती
नि आल्हादलेल्या वृक्षराजाच्या पायावरती
वर्षूं लागती फुलें गुलाबी.
.. अव्यक्तांतून होतें साकार

गुलाबी कमल
लक्ष्मीनें अर्पिलें विष्णूच्या पायीं.
आणि मनाच्या गगनामधून
फिरूं लागते
चंद्रतबकडी.
आणिक घुमतें गीत मखमली.
रातराणिच्या निशिगंधाच्या
मिसळून गेल्या
श्वासतरंगांत्वें !

*

# नाहीं चालूं देणार तुमचे थेर

आतां आम्हीं तुमचे थेर चालूं देणार नाहीं.
आम्ही अल्पसंख्य आहों; अशक्त आहों
आमचीं शरीरें सुदाम्यासारखीं आहेत.
आमच्या हातांत साधी काठी देखील नाहीं.
तुम्ही आम्हांला केव्हांही मारूं शकतां.
तुम्ही बहुसंख्य आहां; बलिष्ठ आहां.
तुमचीं शरीरें जरासंधासारखीं आहेत.
तुमच्या हातांत विनाशी अस्त्रें आहेत.
पण आम्ही तुमचे थेर चालूं देणार नाहीं.
आपल्यामधल्याच सर्व वैगुण्यांना
साकार करून
पूर्णत्वाच्या अर्ध्यामुर्ध्या स्वप्नमय कल्पनांचीं
त्यावर पुटें चढवून
तुम्ही घोटीव तासीव अशी मूर्ति बनविलीत.
तिच्यांत आपल्याच कोंज्या भावनांची
सजीवता ओतलीत.
आणि तिलाच पूर्णत्वाची मूर्ति समजून तिची
पूजा केलीत.
घाणेरडें पाणी सांचलेल्या डबक्यांत
समुद्रावरचें भव्य सौंदर्य दिसलें
अशा तुम्ही थापा मारल्यात.

आंधळ्यानींच आंधळ्यांना वाट दाखवावी
        असें वागलांत.
डोळसांनीं, तुम्ही चुकलां आहां असें
        सांगितलें तर त्यांनाच आंधळे म्हणून
        हिणविलेंत.
आंधळेपणाच्या वेदीवर डोळसांचें मांस
        ओरबाडून खाल्लेंत;
आणि—
वैगुण्यमयाचा गाभा असलेली,
पूर्णत्वाच्या आभासाची पुटें चढवलेली
कोंज्या भावनांनीं सजीव केलेली
मूर्ति तुष्टली
अशी विजयाची काव काव केलीत.
पण यापुढं आम्ही असले थेर चालूं देणार नाहीं.
तुमच्या शक्तीची, शस्त्रांची आम्हाला डर नाहीं.
        आमच्या जीवाची आम्हांला तमा नाहीं.
तुम्ही आम्हांला केव्हांही मारूं शकतां;
पण तुमचे थेर मात्र आम्ही चालूं देणार नाहीं,
कारण,
आम्हीच आतां डोळस बनलों आहोंत

*

# मातीचें स्वप्न !

शांत तेजधारा निरभ्र निळ्या
घुमटांतून मंद वर्षतात.
हिरवी दुलई पांघरलेली
गाढ निद्रेंत गुंगली माती
पहाते स्वप्नें—
असंख्य कोटी माध्यान्हसूर्यांच्या तेजाचा अर्क
भडक तांबडा प्रकाशगोल
अगदीं एकटा अग्निगीत गात
फिरत होता
युगानुयुगें अवकाशांतून
स्थलकल्पनांच्या अतिमर्यादा जेथें विरल्या
ऐसा अवकाश !
आद्यन्तविनाचा शुद्ध अवकाश !
अन् अनंत अश्वशक्तीचा विद्युत्प्रकाश
अग्निसत्त्वरूप, प्रकाशगोल.
एके दिवशीं,
अणुविच्छेदनीं अदृश्य शक्ति
होऊन जागी देते हुंकार.
प्रकाशगोल
फुटे ताडकन् ;
अन् सर्वत्र लहानमोठीं अग्निकंकणॅं
नारायणअस्त्र जणूं जाहलें कार्यप्रवण.

धडधडणारीं तडितावलयें
अंतरिक्षांत !
लघुतमलघु त्यांतील एक भरकटलेली
प्रकाशशलाका
अवकाशाच्या एका कोपऱ्यांत
लागली निवूं
सांचू लागले देहावरि तिच्या रक्षाहिमालय !
स्वप्नीं रंगली दचकते माती. थरथरते क्षण दो क्षण
पाहूं लागते पुनः चित्रपट--
राखेखालची अर्धी विझली प्रकाशठिणगी
घालते साद
रासायनिक होते कांहीं क्रिया
रंग बदलतो शुष्क राखेचा
ओलावते ती अन् बनते
जीवनक्षम मऊ मृत्तिका
लिहिलें जातें पहिलें वहिलें जीवनाचें पान.
स्मित तरलतें झोपेंत गुंगल्या मातीच्या अन्
गालावरती.
पुढें सरकतो स्वप्नचित्रपट--
मानव पक्ष्यांच्या किलबिलाटानें
भरून जातात महान् नगरें.
तारांच्या जाळ्यांत खेळते वीज
सुर्कन् भुर्कन् पळूं लागतात
जमीनीवरून वीजेच्या गाड्या.
आकाशांतून उडूं लागतात आकाशयानें

गगनचुंबी आरसपाणी उंच हवेल्या
उभ्या रहातात.
खडखडखड वाफेचा रूळ फिरूं लागतो
खडी दाबत रस्त्यावरून
खोतले जातात डांबराचे थर
कृत्रिम जल पाझरूं लागतें जलाशयांत
जीव जन्मतात प्रयोगशाळेंत कांचेच्या नळींत
पंचमहाभूतें होतात बंदिस्त
घटोत्कचाची मायानगरी
घेते साकारता.
नाण्यांच्या गाण्यांची धुंद गर्वगीतें
छेडून जातात व्योमशरीराला......

अन् आकाश एके दिवशीं भग्न जानें
अणूस्फोटकांच्या घोर निनादानें
ठिणग्या शलाका अग्निवर्षाव
मायानगरी जाते रसातळीं
सूर्याची माला पडते तुटून
नि अंधकारांत पूर्ण विझून
निर्जीव अचल अचेतनतम
राखेचे ढीग
राखेचे ढीग !
शहारते माती थरकांपून.
फुटते किंकाळी

पिळवटलेल्या दीन हृदयाची·
किंचाळीसरशीं
येते जाग तिला
धडधडतात हृदयाचे ठोके.
नि अगदीं हळूं उघडतात
भेदरलेले कावरे बावरे
पाणावले नेत्र......
दृष्टीस पडतें—
निळ्या निळ्या शार
आकाशजलांत
उमलतांना
नरल गुलाबी प्रकाशकमळ !

*

# चंद्राचा पतंग

रंगीबेरंगी दिव्यादिव्यांनी मुसमुसलेली
मस्त यामिनी उंच उडवून उडवून उंच
नीलमयांत चंद्राचा पतंग
गेली दमून ;
आणि भुवईच्या कमानीखालती
थरकापणाऱ्या पापण्यावरती नाचनाचून
गेली थकून
स्वप्नस्वी अप्सरा
ईषत् चुंबनी पदापदांच्या आघातांतून
जिच्या जन्मल्या साजूक चांदण्या.
श्वास उश्वासाच्या दोन टोकावर
विणून विणून उत्कंठ पट्टा
आला अवधाणा
मनाच्या हातांना.
आणि आता साद, पहांटवेळेस
तुझी क्षीण हांक
विरून चालल्या गंधवलयापरि !
बको विवडुं पण निराशेचा तरिहि गुंता.
केऊं टिपून प्रभाततेंतून

# काढ थोडी कळ

आहे जाणीव मनाला माझ्या
पसरलें घोर क्रूर वाळवंट
तुझ्याभोंवताली.
उठतात लोट वादळी वाळूचे
सूर्याच्या जळक्या स्फोटकाखालीं.
तुझ्या उघड्या जखमांतील उरल्या रक्ताची
बनली वाफ;
आणि उरलें कोरडें कोरडें मागें मासुरडें.

आहे जाणीव मनाला माझ्या
तुझ्या हाडांच्या नळयांच्यामधील जीव ओलावाहि
चालला वाळून
आणि घशाच्या कळकांतील
घोगरी शुष्क कोरडी हांक
प्रतिबिंबते उलटी सुलटी
निर्जीवपणानें
तांब्याच्या लाल अवकाशांतुन:
आणि दिलासा गीतेमधला
"संभवामि युगे युगे" —
भिकारड्याची उरली सुरली दमडी कवडी
वाळवंटाच्या भिक्षापात्रांत
चालली वितळून... ...

ही सारी जाणीव आहे मनाला
काढ तरीहि थोडीशी कळ.
तुझ्या तनूतील आहे जागली
आतां कुंडालिनी.
तृप्त कर तिला
पिऊन टाकूं दे उरले सुरले तिला रक्तबिंदू
आणि हाडांतील जीव ओलावाहि.
काढ थोडी कळ.
अविचल चित्तीं चालूं दे तपस्या
कालकल्पनेच्या गर्भसंभवाच्या वेळची शलाका,
"अहं ब्रह्मास्मि"
होईल जागृत
तृप्त कुंडलिनी स्रवूं लागेल अमृत तुषार.
काढ थोडी कळ.

*